**राज्य शासनाच्या वित्तीय स्थितीबाबत प्रकाशित केलेल्या श्वेतपत्रिकेतील शिक्षण फी सवलत या मुद्याच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यासाठी कार्यगट गठीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन आदेश क्रमांक: संकीर्ण २०१५/प्र.क्र. २६/अर्थबळ**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १ जुलै, २०१५

**प्रस्तावना :-**

मा.राज्यपाल महोदयांनी दिनांक १२ नोव्हेंबर,२०१४ रोजी विधानमंडळाच्या अधिवेशनातील अभिभाषणात राज्याची आर्थिक स्थिती, स्विकृत दायित्वे, भविष्यातील वाटचाल आणि खर्च अधिक पारदर्शक व कार्यक्षमतेने करण्यासाठी आवश्यक उपाययोजना विषद करणारी एक श्वेतपत्रिका शासनाकडून काढण्यात येईल, असे स्पष्ट केले होते. त्यास अनुसरुन वित्त विभागामार्फत तयार करण्यात आलेल्या श्वेतपत्रिकेस मंत्रिमंडळाची मान्यता घेऊन ती सन २०१५ च्या अर्थसंकल्पिय अधिवेशनात विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहासमोर सादर करण्यात आलेली आहे.

२. श्वेतपत्रिकेमध्ये विविध योजनाचे विश्लेषण करतांना शिक्षण फी सवलतीच्या अनुषंगाने शिष्यवृत्ती योजने संदर्भात पुढीलप्रमाणे नमूद करण्यात आलेले आहे :-

"............या योजनाचे पुनर्विलोकन करणे गरजेचे ठरत आहे. अशा सवलती मिळविण्यासाठी विद्यार्थ्यासाठी काही किमान पात्रता निकष व महाविद्यालयासाठी काही किमान दर्जाचे निकष ठरविणे आवश्यक आहे. तसेच सवलतीसाठी पात्र अभ्यासक्रमाची निवड पण काटेकोरपणे व्हावी. विद्यार्थ्याच्या पालकाच्या उत्पन्नाच्या मर्यादे संदर्भात फेरविचार आवश्यक आहे. शिक्षण शुल्क निर्धारण अधिक पारदर्शक व अचूक व्हावी यासाठी ' शिक्षण शुल्क निर्धारणा प्राधिकरण ' स्थापित करण्याची गरज आहे." (पृष्ठ क्र.१६)

**शासन आदेश** :

विविध प्रवर्गातील व विविध अभ्यासक्रमाच्या अनुषंगाने फी सवलती, शिष्यवृत्ती व त्या अनुषंगाने अनुदान देण्याची कार्यवाही शालेय शिक्षण विभाग, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, आदिवासी विकास विभाग, इत्यादी विभागाकडून केली जाते. या परिस्थितीत श्वेतपत्रिकेतील नमूद वरील मुद्दयांच्या अनुषंगाने आवश्यक कार्यवाही करण्याकरीता पुढीलप्रमाणे कार्यगट नेमण्यात येत आहे :-

(१) प्रधान सचिव, (वित्तीय सुधारणा), वित्त विभाग - - अध्यक्ष
(२) अपर मुख्य सचिव, वैद्यकिय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग किंवा त्यांचे प्रतिनिधी - - सदस्य
(३) प्रधान सचिव , सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग - सदस्य
(४) प्रधान सचिव, नियोजन विभाग - सदस्य

| | |
|---|---|
| (५) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग | - सदस्य |
| (६) प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग | - सदस्य |
| (७) उप सचिव (वित्तिय सुधारणा), वित्त विभाग | - सदस्य सचिव |

२. शिक्षण फी सवलत, शिष्यवृत्ती, या अनुषंगानेची पात्रता व निकष, महाविद्यालयासाठी दर्जाचे निकष, शिक्षण शुल्क निर्धारण, इत्यादी बाबी तसेच या योजनांवर होणारा खर्च अधिक पारदर्शक करुन योजना अधिक प्रभावी व परिणामकारक बनविण्याकरीता विद्यमान परिस्थितीस अनुरुप अशा महत्वाच्या बदलाच्या अनुषंगाने सदर कार्यगटाने शिफारशी कराव्यात.

३. कार्यगटाच्या कामाचे समन्वय, निधी उपलब्ध करुन देणे, आवश्यकतेनुसार सल्लागाराची नेमणुक करणे, बैठकांचे आयोजन करणे इत्यादी सर्व बाबी वित्त विभागाच्या वित्तीय सुधारणा या कार्यासनाकडून हाताळण्यात येतील. तसेच बैठकींचे समन्वय व इतर अनुषंगिक बाबी सह सचिव / उप सचिव (वित्तीय सुधारणा) यांच्याकडून करण्यात येईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०११५१२३५८९०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

S K Shrivastava

Digitally signed by S K Shrivastava
DN: CN = S K Shrivastava, C = IN, S = Maharashtra, O = All India Service, OU = IAS
Date: 2015.07.03 11:05:48 +05'30'

**( सुधीर श्रीवास्तव )**
**अपर मुख्य सचिव (वित्त)**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव, वैद्यकिय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, जी.टी.हॉस्पीटल आवार, नवीन मंत्रालय, मुंबई,
५) प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) मंत्रालयीन विभागाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव
१०) उप सचिव (वित्तीय सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) कक्ष अधिकारी (वित्तीय सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवड नस्ती (अर्थबळ).